राज्य मानवी हक्क आयोगासाठी तपासी दलासाठी पदे तसेच विधी व संशोधन उपविभागासाठी प्रबंधकाचे पद निर्माण करणे.

---

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक एचआरसी.१३२०००/संकिर्ण/९८/पोल-१४
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक १ ऑक्टोबर २००१

वाचा: १) शासन निर्णय, गृहविभाग क्रमांक एचआरसी. १०९९/३७८/पोल-१४, दिनांक १५ जानेवारी २०००

२) शासन निर्णय, गृहविभाग क्रमांक एचआरसी.१०९९/३७८/पोल-१४, दिनांक १३.९.२००१

**शासन निर्णय:-** मानवी हक्क संरक्षण अधिनियम १९९३ मधील कलम २१ नुसार राज्यात राज्य मानवी हक्क आयोग निर्माण करण्यात आला आहे. .या आयोगासाठी उक्त अधिनियमातील कलम २७ (१) (ब) नुसार कमीत कमी पोलीस महानिरीक्षक दर्जाचे अधिका-याचे नियंत्रणाखाली पोलीस आणि अन्वेषण कर्मचारीवृंद निर्माण करणे अनिवार्य आहे. तद्नुसार आयोगावर पुढीलप्रमाणे पदे निर्माण करणेस शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | पोलीस महानिरीक्षक | १ | रु. १८४००-५००-२२४०० |
| २ | पोलीस अधिक्षक | १ | रु. १००००-३२५-१५२०० |
| ३ | पोलीस निरीक्षक | २ | रु. ७४५०-२२५-११०५० |
| ४ | पोलीस शिपाई | ४ | रु. ३०५०-७५-३९५-८०-४५९० |
| ५ | वाहन चालक | १ | रु. ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| | एकूण पदे | ९ | |

वरील पदे निर्माण करताना पुढीलप्रमाणे पदे प्रत्यार्पित करण्यासही शासन मंजूरी देत आहे

| पदनाम | | पदसंख्या | पदनिर्मितीसाठी कोणत्या आस्थापनेवरील पद प्रत्यार्पित करण्यात येईल. |
|---|---|---|---|
| १ | पोलीस महानिरीक्षक | १ | लाचलुचपत विरोधी संचालनालय |
| २ | पोलीस अधिक्षक | १ | राज्य गुप्तवार्ता विभाग |
| ३ | पोलीस निरीक्षक | २ | राज्य गुप्तवार्ता विभाग व महामार्ग सुरक्षा विभागाकडून प्रत्येकी एक पद |
| ४. | पोलीस शिपाई | ४ | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई |
| | पोलीस वाहन चालक | १ | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई |
| | एकूण पदे | ९ | |

२. वरील प्रमाणे पदे त्या त्या आस्थापनेवरुन प्रत्यार्पित करण्यात येणार असल्याने संबंधित आस्थापनेने त्यांचे वेतन व भत्ते यासाठी असलेली ऑक्टोबर २००१ ते मार्च २००२ या कालावधीची तरतूद राज्य मानवी हक्क आयोगाचे आस्थापनेवर म्हणजेच त्याचे लेखा शिर्ष "२०५२-सचिवालय-सामान्य सेवा - ०९०(एक)(पाच) राज्य मानवी हक्क आयोग (२०५२०५१७)" याकडे तात्काळ वर्ग करावी.

३. न्यायिक संस्थेचे काम प्रबंधकामार्फत चालते. त्यामुळे राज्य मानवी हक्क आयोगाचे आस्थापनेवर प्रबंधकाचे एक पद रु. १४३००-४००-१८३००/- या वेतनश्रेणीत राज्य मानवी हक्क आयोगाचे आस्थापनेवर र्माण करणेसाठी शासन मंजूरी देत आहे.

४. वरील पद निर्मितीसाठी होणारा खर्च २०५२-सचिवालय- सामान्य सेवा- ०९०- सचिवालय-०९०-(एक)(पाच) राज्य मानवी हक्क आयोग ( २०५२०५१७), या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदरहू खर्च वित्त विभाग क्रमांक आकनि.११०१/३१/अर्थ संकल्प १०(८०००-०३१-९/२०) दिनांक १.१०.२००१ अन्वये आकस्मिकता निधीतुन वाढवून दिलेल्या रु. ८,३६,०००(रुपये आठ लाख छत्तीस हजार फक्त) एवढया अग्रिमातुन करण्यात यावा. या अग्रिमाची प्रतिपूर्ती करण्यासाठी आगामी अधिवेशनात पूरक मागणी सादर करण्यात येईल.

५. नियंत्रण अधिका-यांना असेही कळविण्यात येते की, त्यांनी आकस्मिकता निधीतून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-यांकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात/पत्रात आगाऊ

रक्कमेतुन खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर आकस्मिता निधी अग्रिम शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक आकनि.११०१/३१/अर्थ संकल्प-१०(८०००३१-९ /२० दिनांक १.१०.२००१ अन्वये मंजूर असे लाल शाईने अधोरेखीत करावे. तसेच आकस्मिकता निधीतुन काढलेल्या अग्रिमातून करावयाच्या/खर्चाबाबत महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील प्रकरण १६ मध्ये विशद केलेल्या नियमाची व शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. सीएनएफ १०८६/१५३ अर्थसंकल्पीय -३ , दिनांक २८.८.१९९६ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचेही काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच अग्रीमातून प्रत्यक्ष केलेल्या खर्चाची एकत्रित माहिती त्यांनी त्या महिन्यानंतर १५ तारखेपर्यंत वित्त विभागास (अर्थसंकल्प ३) मंत्रालय, मुंबई यांना पाठवावी व त्याची एक प्रत गृह विभाग यांजकडे पाठविण्यात यावी.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाचे सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक.सीआर.११७९/२००१/व्यय-७ दिनांक १७.९.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

1/10/01

12ws

(( अ.ना.भोसले )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृहविभाग.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, लाचलुचपत विरोधी संचालनालय, मुंबई,
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई
अपर पोलीस महासंचालक, महामार्ग सुरक्षा विभाग, मुंबई.
विशेष कार्य अधिकारी, राज्य मानवी हक्क आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस महानिरीक्षक (मानवी हक्क)महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-७) ( वित्तीय सुधारणा),
गृह विभाग (बीयुडी १) (आस्था.२), (पोल-1)
संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई ३२
निवड नस्ती.

WORDPRO BHOSLE.LET.POL